लोकसभा निवडणूक सन २०२४ पोलीस बंदोबस्ताकरिता पोलीस अधीक्षक, जळगाव यांनी भाडेतत्वावर अधिग्रहित केलेल्या राज्य परिवहन महामंळाच्या एसटी बसेसच्या भाड्यापोटी देय रक्कम रु. ३४,२४,५४५/- अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. E-१०५५१८९/H.D.४००१०/३९/२०२५/SPECIAL-१A**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : २८ मार्च, २०२५**

**संदर्भ** :- पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र DGPD३००२७/२१/२०२४-DESK३०, दिनांक २५/०३/२०२५

**प्रस्तावना :-**

पोलीस अधीक्षक, जळगाव यांनी सार्वत्रिक लोकसभा निवडणूक, २०२४ साठी पोलीस अधीक्षक, जळगाव कार्यालयांतर्गत जळगाव जिल्ह्यातील लोकसभा मतदार संघातील निवडणुकीदरम्यान बंदोबस्ताकरिता CAPF/SAP,CISF,BSF व CRPF कंपनी अधिकारी तसेच जळगाव जिल्हा पोलीस घटकाचे आस्थापनेवरील पोलीस अधिकारी/अंमलदार यांना बाहेर जिल्ह्यातून जळगाव जिल्ह्यात आणणेकरिता तसेच जिल्ह्यांतर्गत बंदोबस्ताकरीता राज्य परिवहन महामंळाच्या एसटी बसेस भाडेतत्वावर अधिग्रहित केली होती. सदर अधिग्रहित केलेल्या राज्य परिवहन महामंळाच्या एस.टी. बसेसच्या भाड्यापोटी एकूण रु. ३४,२४,५४५/- (अक्षरी रुपये चौतीस लाख चोवीस हजार पाचशे पंचेचाळीस मात्र) इतकी देय रक्कम अदा करण्यास कार्योत्तर मंजूरी मिळणेबाबतच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

पोलीस अधीक्षक, जळगाव यांनी सार्वत्रिक लोकसभा निवडणूक, २०२४ साठी पोलीस अधीक्षक, जळगाव कार्यालयांतर्गत जळगाव जिल्ह्यातील लोकसभा मतदार संघातील निवडणुकीदरम्यान बंदोबस्ताकरिता CAPF/SAP,CISF,BSF व CRPF कंपनी अधिकारी तसेच जळगाव जिल्हा पोलीस घटकाचे आस्थापनेवरील पोलीस अधिकारी / अंमलदार यांना बाहेर जिल्ह्यातून जळगाव जिल्ह्यात आणणेकरिता तसेच जिल्ह्यांतर्गत बंदोबस्ताकरीता अधिग्रहित केलेल्या राज्य परिवहन महामंळाच्या एस.टी. बसेसच्या भाड्यापोटी एकूण रु. ३४,२४,५४५/- (अक्षरी रुपये चौतीस लाख चोवीस हजार पाचशे पंचेचाळीस मात्र) इतकी देय रक्कम अदा करण्यास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च  " मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस (००) १०९, जिल्हा पोलीस (००)(००)(०१) जिल्हा पोलीस बल, दत्तमत (अनिवार्य) (२०५५ ०१६८) ५०- इतर खर्च " या लेखाशिर्षाखाली  वित्तीय वर्ष २०२४-२५ च्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

वरील वाहनांच्या भाड्यापोटी प्राप्त होणाऱ्या देयकांची छाननी करुन ती योग्य असल्याची खातरजमा करण्यात आल्यानंतर सदर देयक अदा करण्यात यावीत.

सदरचा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-१, उपविभाग-२, अनुक्रमांक-१३, नियम क्र. ६० व ६१ अन्वये तसेच वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-१ मधील अनुक्रमांक ६, नियम-४० अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१८०२४८६७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT ANANT MAHAJAN

Digitally signed by HEMANT ANANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=18b72890e049ba3219e993bae40e4fae87fba16fd8c92cbf7f96107d9c100ae1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4146B85AAA58555E80C9D75A2ABA23B993E46DF208B0B469F1B74670DC22D7FA, cn=HEMANT ANANT MAHAJAN
Date: 2025.03.28 18:03:29 +05'30'

(हेमंत महाजन)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. पोलीस अधीक्षक, जळगाव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई)
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६. निवडनस्ती (कार्यासन विशा-१अ)